**"डावी कडवी विचारसरणीग्रस्त जिल्हयांसाठी अतिरिक्त केंद्रीय सहाय्य" या योजनेंतर्गत गडचिरोली, गोंदिया , चंद्रपुर व भंडारा या जिल्ह्यांसाठी रु. १६.०० कोटी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नक्षल २०१३/प्र.क्र.२१५/१३ /का.१४१७**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०३ जानेवारी , २०१५.

वाचा- **१) शासन निर्णय, नियोजन विभाग क्र. नक्षल २०१३/प्र.क्र.२१५/१३/का.१४१७ ,दि. ८ जानेवारी ,२०१४,**
**२) शासन निर्णय, नियोजन विभाग क्र. नक्षल २०१३/प्र.क्र.२१५/१३/का.१४१७ , दि. ९ मे ,२०१४.**
**३) शासन निर्णय, नियोजन विभाग क्र. नक्षल २०१३/प्र.क्र.२१५/१३/का.१४१७ , दि. २४ डिसेंबर २०१४.**

**प्रस्तावना :**

योजना आयोग , भारत सरकार यांनी देशातील निवडक आदिवासी व मागास जिल्हयांसाठी राबविण्यात येत असलेल्या एकात्मिक कृती आराखडा कार्यक्रम या कार्यक्रमाच्या स्वरुपामध्ये बदल करुन तो नव्या स्वरुपात सन २०१३-१४ पासुन "डावी कडवी विचारसरणीग्रस्त जिल्हयांसाठी अतिरीक्त केंद्रीय सहाय्य" म्हणुन बाराव्या पंचवार्षिक योजनेच्या उर्वरीत कालावधीकरिता राबविण्याचे निश्चित केले आहे. या कार्यक्रमामध्ये महाराष्ट्रातील गडचिरोली, गोंदिया , चंद्रपुर व भंडारा या चार जिल्हयांचा समावेश करण्यात आलेला आहे. या कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ या वर्षाकरिता प्रतिजिल्हा रु. ३०.०० कोटी याप्रमाणे केंद्र शासनाकडुन एकूण रु. १२०.०० कोटी निधी अतिरिक्त केंद्रीय सहाय्य म्हणुन राज्यास प्राप्त होणार आहेत. केंद्र शासनाकडुन सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता निधीचा पहिला हप्ता प्रतिजिल्हा रु. २०.०० कोटी याप्रमाणे एकुण रु. ८०.०० कोटी राज्यास मंजुर करण्यात आलेला असुन केंद्रीय वित्त मंत्रालयाच्या पत्र क्र. ४४(५)/२०१४-९३० , दि. ०३/११/२०१४ अन्वये राज्याच्या एकत्रित संचित निधीमध्ये जमा करण्यात आलेला आहे. प्राप्त निधीपैकी शासन निर्णय क्र. नक्षल-२०१३/प्र.क्र.२१५/१३/का.१४१७ , दि.२४ डिसेंबर ,२०१४ अन्वये रु. ६४.०० कोटी प्रतिजिल्हा रु. १६.०० कोटी याप्रमाणे गडचिरोली, गोंदिया , चंद्रपुर व भंडारा या जिल्हयांना निधी वितरित करण्यात आला आहे. उर्वरीत रु. १६ कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

"डावी कडवी विचारसरणीग्रस्त जिल्हयांसाठी अतिरीक्त केंद्रीय सहाय्य" या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडुन प्राप्त झालेल्या निधीच्या पहिल्या हप्त्यापैकी प्रतिजिल्हा रु. ४.०० कोटी याप्रमाणे एकुण रु. १६.०० कोटी या शासन निर्णयान्वये गडचिरोली, गोंदिया , चंद्रपुर व भंडारा या जिल्हयांसाठी मंजूर करण्यात येत आहे. सदर रक्कम जिल्हाधिकारी , गडचिरोली, गोंदिया , चंद्रपुर व भंडारा यांना वितरित करण्यात येत आहे. सदरहून रक्कम ही अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) उपलब्ध आहे.

२. या अनुषंगाने होणारा खर्च "मागणी क्र. ओ-७, ३४५१ सचिवालय आर्थिक सेवा, ०९० सचिवालय, (०४) नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृती दल , (०४) (०३) डावी कडवी विचारसरणीग्रस्त जिल्हयांसाठी अतिरीक्त केंद्रीय सहाय्य (केंद्र पुरस्कृत योजना), संगणक संकेतांक (३४५१ ३०६३) (योजनांतर्गत) , ५० इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी या योजनेकरिता मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. सदरहू निधी उपरोक्त लेखाशिर्षाखाली कोषागार कार्यालय, गडचिरोली, गोंदिया , चंद्रपुर व भंडारा येथून आहरित करण्यासाठी जिल्हाधिकारी, गडचिरोली, गोंदिया , चंद्रपुर व भंडारा यांना "नियंत्रक अधिकारी" व जिल्हा नियोजन अधिकारी, गडचिरोली, गोंदिया , चंद्रपुर व भंडारा यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. योजना आयोग, भारत सरकार यांचे पत्र क्र. एम-१३०५३/६/२/२०१३-एमएलपी (Vol II) , दि. १८ सप्टेंबर , २०१३ व दि. १२ जुन,२०१४ अन्वये देण्यात आलेल्या तसेच यापुढे वेळोवेळी देण्यात येणा-या सुचनांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५९२/१४/व्यय-८, दिनांक ०१ /१२/२०१४ व अनौपचारीक संदर्भ क्रमांक २०८/२०१४-१५/अर्थोपाय, दिनांक ०८ /१२/२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०१०३१४५५४०३०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.01.03 15:04:39 +05'30'

**( वसंत कुळकर्णी )**
उप सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. सदस्य सचिव, योजना आयोग, योजना भवन, संसद मार्ग, नवी दिल्ली - ११० ००१.
४. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
५. जिल्हाधिकारी , गडचिरोली/ गोंदिया / चंद्रपुर / भंडारा.
६. सह सचिव (वि. शा.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, ५ वा मजला, न. प्र. भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-३२.
८. निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली/ गोंदिया / चंद्रपुर / भंडारा..
११. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली/ गोंदिया / चंद्रपुर / भंडारा..
१२. वित्त विभाग/व्यय-८, अर्थ-३, अर्थ-१६, साधनसंपत्ती, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई- ३२.
१३. कार्यासन अधिकारी (का. १४११/१४१४/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
१४. निवड नस्ती का. १४१७.